**डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विघयो-२०१६/प्र.क्र.१७६/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ५ जानेवारी, २०१७

**वाचा:**

१. **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), यांचे पत्र क्र. विप्र-७/ आउयो/ विघयो/ पुनर्विलोकन/ २६१/२०१६, दि. २७ एप्रिल, २०१६**

**प्रस्तावना:**

अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढवून त्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी विशेष घटक योजना सन १९८२-८३ पासुन राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत जमीन सुधारणा, निविष्ठा पुरवठा, पीक संरक्षण अवजारे/ शेतीची सुधारीत अवजारे, बैलगाडी, बैलजोडी/ रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहीर दुरुस्ती, पाईपलाईन, पंपसेट, नवीन विहीर इत्यादी बाबी विहित मर्यादेत १००% अनुदानावर अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांना पुरविण्यात येत होत्या. सदर योजना दिर्घ कालावधीपासून राबविण्यात येत असल्याने, योजनेचे पुनर्विलोकन करण्याचा निर्णय विभागाने घेतला. त्यासाठी विभागीय कृषी सहसंचालक, नागपूर यांचे अध्यक्षतेखाली, दि. २४ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने दि.१९ एप्रिल,२०१६ रोजी अहवाल सादर केला. कृषी आयुक्तालयाने दि. २७ एप्रिल, २०१६ च्या पत्रान्वये आयुक्तालयाच्या शिफारशीसह अहवाल शासनास सादर केला.

मा.मंत्री (वित्त) यांनी सन २०१६-१७ या वर्षाचा अर्थसंकल्प सादर करताना, "डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजना" या नवीन योजनेच्या माध्यमातून अनुसूचित जातीच्या शेतकऱ्यांना आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी बनविण्यासाठी विहीर खोदण्याकरीता रु.२ लाखांपर्यंत अनुदान देण्यात येईल. तसेच विहिरीवर विद्युत पंप बसविणे आणि जेथे ग्रीडमधून वीज पुरवठा करणे शक्य नसेल तेथे सौर उर्जेतून वीज जोडणी देण्यात येईल. या माध्यमातून त्यांच्या शेतीची उत्पादकता वाढविण्यात मदत होईल" अशी घोषणा केली.

प्रचलीत विशेष घटक योजनेमध्ये विहीर, विद्युत पंप या घटकांचा समावेश आहे. त्यामध्ये विहीरीसाठी अनुदानाची मर्यादा रु.१ लाख एवढी आहे. योजनेचे पूनर्विलोकन करण्यासाठी नियुक्त समितीने केलेल्या शिफारशीमध्ये, विहिरीसाठी अनुदानाची मर्यादा रु.१ लाख वरुन रु.२ लाख एवढी करण्याची शिफारस केली आहे. त्याचप्रमाणे, आयुक्तालयाने नवीन विहीर घेणाऱ्या लाभार्थ्यास, विहिरीसाठी रु. २ लाख; विद्युतपंपासाठी रु.२५,०००; वीज जोडणीसाठी रु.१०,००० व ठिबक सिंचन संचासाठी रु.५०,०००/स्प्रिंकलर सिंचन संचासाठी रु.२५,००० याप्रमाणे रु.२,८५,०००/रु.२,६०,००० एवढ्या रकमेचे पॅकेज देण्याची शिफारस केली.

अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांसाठी विशेष घटक योजना राबविण्यात येत आहे. सदर योजनेमध्ये मा. मंत्री (वित्त) यांनी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पीय भाषणात घोषित केलेल्या डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन या नवीन योजनेत विहीर, विद्युत पंप या घटकांचाही समावेश आहे. यास्तव, अनुसूचित जाती/नवबौध्द शेतकऱ्यांसाठी प्रचलित असलेली विशेष घटक योजना व मा. मंत्री (वित्त) यांनी घोषित केलेली डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वालंबन योजना, या दोन योजना स्वतंत्रपणे न राबविता, बदलेल्या परिस्थितीची गरज विचारात घेऊन, जमिनीतील ओलावा टिकवून ठेवण्याच्या दृष्टीकोनातून (moisture security) सध्याची प्रचलित विशेष घटक योजना, "डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजना" या नावाने या शासन निर्णयातील नमूद घटकांसाठीच राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

अनुसूचित जाती/नवबौद्ध शेतकऱ्यांसाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता मान्यता देण्यात येत आहे.

२ सदर योजनेंतर्गत खालील घटकांसाठी त्यापुढे नमूद रकमेच्या मर्यादेत अनुदान देण्यात येईल.

| अ.क्र. | बाब | अनुदानाची मर्यादा (रुपये) |
|---|---|---|
| १ | नवीन विहीर | २,५०,०००/- |
| २ | जुनी विहीर दुरुस्ती | ५०,०००/- |
| ३ | इनवेल बोअरींग | २०,०००/- |
| ४ | पंप संच | २५,०००/- |
| ५ | वीज जोडणी आकार | १०,०००/- |
| ६ | शेततळयांचे प्लॅस्टिक अस्तरीकरण | १,००,०००/- |
| ७. | सूक्ष्म सिंचन संच | परिच्छेद ७ मध्ये नमूद मंत्री मंडळ उपसमितीने निश्चित केलेल्या सूत्रानुसार |

३. सदर योजनेतील नवीन विहीर व त्यासोबतच्या घटकांची (पंपसंच, वीज जोडणी आकार, सूक्ष्म सिंचन संच),(नविन विहीर घटकासाठी या वर्षात या पूर्वी निवड़ झालेल्या लाभार्थ्यांसह) अंमलबजावणी सन २०१६-१७ या वर्षात करण्यात येईल.

४. सदर योजनेतील वरिल घटकांपैकी उर्वरीत सर्व घटकांसह अंमलबजावणी सन २०१७-१८ या वर्षापासून करण्यात येईल.

५. प्रचलित विशेष घटक योजनेंतर्गत सन २०१६-१७ या वर्षात निवड करण्यात आलेल्या लाभार्थ्यांना, उर्वरीत सर्व घटकांसाठी (नवीन विहीर, त्यासोबतचे पंपसंच, व सूक्ष्म सिंचन संच वगळून) सदर योजनेंतर्गत अनुज्ञेय असलेल्या दरानेच व विहीत मर्यादेत अनुदान देण्यात येईल.

६. सदर योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनासाठी देण्यात येणारे अनुदान, प्रधान मंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत अनुसूचित जाती/नवबौद्ध शेतकऱ्यांना सूक्ष्म सिंचनासाठी देण्यात येणाऱ्या अनुदानास पुरक अनुदान म्हणून देण्यात येईल.

७. सूक्ष्म सिंचन संचाच्या अनुदानाचे सूत्र व कार्यप्रणाली ठरविणे करीता मंत्री मंडळाची उप समिती गठीत करण्यात येत आहे. या उप समितीच्या निर्णयाप्रमाणे अनुदानाची रक्कम व कार्यप्रणाली लागू राहील.

८. नवीन विहीर या घटकाचा लाभ घेणाऱ्या शेतकऱ्यास, विहिरीसोबतच पंप संच, वीज जोडणी आकार असे एकत्रित रु.२.८५ लक्ष/२.६० लक्ष च्या मर्यादेत व परिच्छेद ७ मध्ये नमूद उप समितीने निश्चित केलेल्या सूत्रांनुसार सूक्ष्म सिंचनासाठी अनुज्ञेय अनुदान, असे एकत्रित पॅकेज देण्यात येईल.

९. जूनी विहीर दुरुस्ती या घटकाचा लाभ घेणाऱ्या शेतकऱ्यास, विहिर दुरुस्तीसोबतच पंप संच, वीज जोडणी आकार असे एकत्रित रु.८५,०००/६०,००० च्या मर्यादेत व परिच्छेद ७ मध्ये नमूद उप समितीने निश्चित केलेल्या सूत्रांनुसार सूक्ष्म सिंचनासाठी अनुज्ञेय अनुदान, असे एकत्रित पॅकेज देण्यात येईल.

१०. ज्या शेतकऱ्यास ग्रामविकास व जलसंधारण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या "मागेल त्याला शेततळे" योजनेमध्ये शेततळे मंजूर झाले असेल अशा शेतकऱ्यास, शेततळ्याचे अस्तरीकरण, वीजपंप, वीज जोडणी आकार असे एकत्रित रु.८५,०००/रु.६०,००० च्या मर्यादेत व परिच्छेद ७ मध्ये नमूद उप समितीने निश्चित केलेल्या सूत्रांनुसार सूक्ष्म सिंचनासाठी अनुज्ञेय अनुदान, असे एकत्रित पॅकेज देण्यात येईल .

११ प्लॅस्टीक अस्तरीकरणासाठीच्या खर्चाची परिगणना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे ३०० मायक्रॉनच्या प्लॅस्टीकसाठी रु.९५ प्रति चौ.मि. या दराने करण्यात येईल व प्रत्यक्ष खर्चाएवढे कमाल रु.१,००,००० च्या मर्यादेत अनुदान देण्यात येईल.

१२. ज्या शेतकऱ्यांनी यापुर्वीच शासकीय योजनेतून विहीर घेतली असेल किंवा स्वखर्चाने विहीर बांधली असेल अशा शेतकऱ्यास पंपसंच, वीज जोडणी असे एकत्रित रु.८५,०००/रु.६०,००० च्या मर्यादेत व परिच्छेद ७ मध्ये नमूद उप समितीने निश्चित केलेल्या सूत्रांनुसार सूक्ष्म सिंचनासाठी अनुज्ञेय अनुदान, असे एकत्रित पॅकेज देण्यात येईल.

१३. लाभार्थ्यास महावितरण कंपनीकडून सोलर पंप मंजूर झाला असेल तर पंपसंच व वीज जोडणीसाठी अनुज्ञेय अनुदानाच्या मर्यादेत (रु.३५,०००) लाभार्थी हिश्श्याची रक्कम महावितरण कंपनीस अदा करण्यात येईल.

१४. लाभार्थ्याकडे जर काही घटक उपलब्ध असतील तर उर्वरित आवश्यक घटकांचा लाभ विहित मर्यादेत देण्यात येईल.

१५. सदर योजनेंतर्गत ७०% अनुदानाचा लाभ अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना देण्यात येईल.

१६. नवीन विहिर, जूनी विहिर दुरुस्ती या घटकाचा लाभ घेणाऱ्या शेतकऱ्याने ईनवेल बोअरिंगची मागणी केल्यास सदर शेतकऱ्यास नवीन विहीर व त्यासोबतच्या एकत्रित पॅकेजसाठी देण्यात येणाऱ्या अनुदानाव्यतिरिक्त रु.२०,०००/- इतके अतिरिक्त अनुदान देण्यात येईल.

१७. सदर योजनेंतर्गत सन २०१७ या वर्षात (जानेवारी-२०१७ ते डिसेंबर-२०१७) २५,००० विहिरींचे उद्दिष्ट पुर्ण करण्यात येईल.

१८. सन २०१७ या वर्षातील २५,००० विहिरींच्या उद्दीष्टांपैकी १०,००० विहिरींचे उद्दिष्ट जानेवारी-२०१७ ते मार्च-२०१७ या कालावधीत पूर्ण करण्यात येईल. उर्वरीत १५,००० विहिरींचे उद्दिष्ट एप्रिल-२०१७ ते डिसेंबर-२०१७ या कालावधीत पूर्ण करण्यात येईल.

१९. लाभार्थ्याला देय अनुदानाची रक्कम त्याच्या बँक खात्यावर आरटीजीएस द्वारे जमा करण्यात येईल.

२०. या योजनेंतर्गत लाभ घेतलेल्या लाभार्थ्यांची माहिती भरण्यासाठी कृषी आयुक्तालयाकडून GIS आधारीत संकेतस्थळ (website) तयार करण्यात येईल. लाभार्थ्यांची यादी सविस्तर तपशीलासह (त्याने लाभ घेतलेले घटक, त्याला देण्यात आलेले अनुदान इत्यादीबाबतची माहिती) सदर संकेतस्थळ (website) वर सुद्धा टाकण्यात येईल. त्याचप्रमाणे सदर माहिती सामाजिक न्याय विभागाच्या संकेतस्थळावर सुद्धा टाकण्यात येईल.

२१. सदर योजना सन २०१६-१७ मध्ये राबविण्यासाठी रु.२८३.०० कोटी एवढा निधी सामाजिक न्याय विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल.

२२. सन २०१७-१८ या वर्षात रु.६००.०० कोटी व पुढील प्रत्येक वर्षी रु.४००.०० कोटी एवढा निधी सामाजिक न्याय विभागाकडून प्रत्येक वर्षी उपलब्ध करुन देण्यात येईल.

२३. सदर योजनेसाठीची आवश्यक तरतूद विशेष घटक योजनेसाठी असलेल्या लेखाशिर्षाखाली करण्यात येईल.

## २४. लाभार्थी पात्रतेच्या अटी

डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषी स्वावलंबन योजनेंतर्गत योजनेचा लाभ घेण्यासाठी खालील अटींची पूर्तता करणारे लाभार्थी पात्र असतील:

I. लाभार्थी हा अनुसूचित जाती/नवबौद्ध शेतकरी असला पाहिजे.
II. शेतकऱ्याकडे सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले जात प्रमाणपत्र असले पाहिजे.
III. शेतकऱ्याच्या नावे जमिन धारणेचा ७/१२ दाखला व ८-अ उतारा असणे आवश्यक आहे.
IV. लाभार्थ्याकडे आधार कार्ड असणे आवश्यक आहे.
V. लाभार्थ्याचे बँक खाते असणे व सदर बँक खाते आधार कार्डशी संलग्न असणे आवश्यक आहे.
VI. दारीद्रय रेषेखालील लाभार्थ्यास प्रथम प्राधान्य.
VII. दारीद्रय रेषेखाली नसलेले अनुसूचित जाती/नवबौद्ध शेतकरी खालील अटींची पूर्तता करत असतील तर योजनेचा लाभ घेण्यास पात्र असतील.
   **अ.** शेतकऱ्याचे सर्व मार्गाने मिळणारे वार्षिक उत्पन्न रु.१,५०,००० पेक्षा जास्त नसेल.
   **आ.** सदर शेतकऱ्याकडे किमान ०.४० हेक्टर व कमाल ६ हेक्टर एवढी शेत जमीन असेल.

## २४ लाभार्थी निवड करण्याची कार्यपद्धती:-

लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी पुढील कार्यपद्धती अवलंबण्यात यावी:

१. योजनेची अंमलबजावणी जिल्हा परीषदेमार्फत करण्यात येईल.
२. लाभार्थ्यांकडून अर्ज स्विकारण्यासाठी संगणक आज्ञावली विकसीत करण्यात यावी. प्रत्येक वर्षी लाभार्थी निवडीसाठी वृत्तपत्रामध्ये जाहिरात देऊन गट विकास अधिकारी यांचेकडून विहित नमून्यात अर्ज ऑनलाईन स्विकारण्यात येतील.
३. शेतकऱ्यांनी अर्जासोबत खालील कागदपत्रे सादर करणे आवश्यक राहील.
   ३.१- अर्जावर अर्जदाराचे अलीकडे काढलेले छायाचित्र,
   ३.२- सक्षम अधिकाऱ्याने दिलेल्या जात प्रमाणपत्राची प्रत,
   ३.३- जमिन धारणेचा ७/१२ चा दाखला, ८-अ चा उतारा,
   ३.४- आधार कार्डाची प्रत,
   ३.५- बँकेच्या पास-बुकाची प्रत,

४. प्रचलित विशेष घटक योजनेच्या लाभार्थी निवडीसाठी असलेल्या अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद, यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे असलेल्या समितीकडून लॉटरी पद्धतीने लाभार्थ्यांची निवड करण्यात येईल.

| | | |
|---|---|---|
| १. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २. | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ३. | कार्यकारी अभियंता, लघुसिंचन, जिल्हा परिषद | सदस्य |
| ४. | भूजल सर्वेक्षण यंत्रणेचे जिल्हास्तरीय अधिकारी | सदस्य |
| ५. | जिल्हा समाज कल्याण अधिकारी | सदस्य |
| ६. | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ७. | कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य सचिव |

२५. कार्यक्रमाची अंमलबजावणी त्या वर्षात उपलब्ध झालेल्या अनुदानाच्या मर्यादेत त्या आर्थिक वर्षातच पूर्ण करण्यात यावी.

२६. निवड झालेल्या लाभार्थ्यांपैकी काही लाभार्थी योजनेचा लाभ न घेण्याचीही शक्यता असते. यास्तव, यापूर्वी योजनेची अंमलबजावणी करताना जिल्हा परीषदेला आलेल्या अनुभवाच्या आधारे आवश्यक तेवढ्या अधिकच्या लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी. सदर लाभार्थ्यांना त्यांच्या ऑनलाईन अर्जाच्या क्रमवारीनुसार प्रतिक्षाधीन क्रमांक देण्यात यावेत. प्रतिक्षाधीन यादीवरील अर्जदारास पाठविण्यात आलेल्या पत्रामध्ये, निवड झालेल्या लाभार्थ्यांपैकी काही लाभार्थ्यांची निवड अपरीहार्य कारणास्तव रद्द झाल्यासच त्यांची प्राथम्यक्रमानुसार निवड करण्यात येईल, असे स्पष्टपणे कळविण्यात येईल.

२७. **लाभार्थ्यांची निवड रद्द करणे व नवीन लाभार्थी निवडणे:-**

पुढील परिस्थितीत निवड करण्यात आलेल्या लाभार्थ्यांची निवड रद्द करण्यात येईल

१. निवड केलेल्या शेतकऱ्याचे निधन झाल्यास.
२. निवड झालेल्या शेतकऱ्याने आपली सर्व शेतजमीन विकून तो भूमीहीन झाला असल्यास.
३. निवड झालेल्या शेतकऱ्याने अर्थसहाय्य घेण्यास नकार दिल्यास.
४. मृत लाभधारकाऐवजी त्याचा वारसदार योजनेचा लाभ घेण्यास इच्छूक असल्यास त्याची निवड प्राथम्याने करण्यात यावी.
५. इतर बाबतीत प्रतिक्षा यादीतील प्राथम्य क्रमानुसार लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

२८. योजनेचा लाभ दिलेल्या लाभार्थ्याची सविस्तर माहिती, त्याला दिलेल्या लाभांच्या घटकासह व अनुदानाच्या रकमेसह कृषी विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात यावी.

सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व वित्त विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०५१७३६२८१४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.01.05 17:55:01 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. मंत्री (कृषी), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. मंत्री (सामाजिक न्याय), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री (कृषी), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
७. मा. अ. मु. स. (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
८. मा. अ. मु. स. (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
९. मा. सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
१०.आयुक्त कृषि , कृषि आयुक्तालय, महाराष्ट राज्य पुणे.
११.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे (१० प्रतीसह)
१२.सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट राज्य पुणे.
१३.सर्व विभागीय कृषी सह संचालक,
१४.सर्व विभागीय आयुक्त,
१५.सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास मंडळ,
१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१९.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०.व्यवस्थापकीय संचालक, महाबीज, अकोला,
२१.सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
२२.सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
२३.महासंचालक माहिती व जनसंपर्क सचालनालय,मुंबई.
२४.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
२५.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर
२६.सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कार्यासन अधिकारी, (कृषि) कृषि व पदुम विभाग
२७.ग्रामविकास व जलसंधारण विभाग मंत्रालय मुंबई ३२

२८. वित्त विभाग व्यय १/अर्थसंकल्प १३, मंत्रालय, मुंबई -३२
२९.नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई - ३२,
३०.सामाजिक न्याय विभाग
३१.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
३२.मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३३.निवड नस्ती.